**अॅड. श्री. महेश मुळे यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत....**

**एम.एच.बी.कॉलनी पोलीस ठाणे, मुंबई येथे गु.र.क्र. ७५९/२०२० मधून उद्भवलेल्या मा. विशेष सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई येथील सेशन केस क्र. ४९/२०२१ व मा. बाल न्याय मंडळ, डोंगरी, मुंबई येथील केस क्र. ४८०००५२/जेडब्ल्यू/२०२१ या न्याय प्रकरणी न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-एसपीपी-०४२१/प्र.क्र.९४/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २२ डिसेंबर, २०२१

**संदर्भ :-** शासन अधिसूचना,विधि व न्याय विभाग, क्र.एसपीपी-२०२१/यू.ओ.आर.३०/डी-१४, दि. ०६.०५.२०२१

**शासन निर्णय :-**

एम.एच.बी.कॉलनी पोलीस ठाणे, मुंबई येथे गु.र.क्र. ७५९/२०२० मधून उद्भवलेल्या मा. विशेष सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई येथील सेशन केस क्र. ४९/२०२१ व मा. बाल न्याय मंडळ, डोंगरी, मुंबई येथील केस क्र. ४८०००५२/जेडब्ल्यू/२०२१ या न्याय प्रकरणी शासनाची बाजू मांडण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त अॅड. श्री. महेश मुळे यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**मा. बाल न्याय मंडळ, डोंगरी, मुंबई येथे**
प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.१५,०००/- (रुपये पंधरा हजार फक्त)

**मा. विशेष सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई येथे**
प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.२०,०००/- (रुपये वीस हजार फक्त)
विचारविनिमय फी (प्रति बैठक/प्रति दिन)- रु.२,०००/- (रुपये दोन हजार फक्त)

सदर व्यावसायिक फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ अॅड. श्री. महेश मुळे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता व्यावसायिक फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय तपास अधिकारी/ पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच अॅड. श्री. महेश मुळे यांची संबंधित न्यायालयातील न्यायालयीन उपस्थिती मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून प्रमाणित करुन घेण्यात यावी. अॅड. श्री. महेश मुळे यांना कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या " मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) २८ व्यावसायिक व विशेष सेवा " या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.४७७/२०२१/व्यय-७, दि.१२.०७.२०२१ अन्वये मिळालेल्या शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२११२२२१६५४०५१८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2021.12.22 16:54:32 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२) पोलीस सह आयुक्त (का. व सु.), मुंबई.
३) पोलीस उपायुक्त, एम.एच.बी. कॉलनी पो.स्टे., बोरीवली (प), मुंबई.
४) वरिष्ठ पोलीस निरीक्षक, एम.एच.बी. कॉलनी पो.स्टे., बोरीवली (प), मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई-१, महाराष्ट्र राज्य.
६) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) ॲड. महेश मुळे, ऑ.क्र.८, मार्डन हाऊस, २ रा माळा, डॉ.व्ही.बी.गांधी मार्ग, फोर्ट, मुंबई-१.
९) कार्यासन अधिकारी (का-१४), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (पोल-१०)